विशेष भूसंपादन अधिकारी, कोकण रेल्वे प्रकल्प, रत्नागिरी यांचे नावे असलेले स्वीय प्रपंजी लेखे विशेष भूसंपादन अधिकारी, कोकण रेल्वे १, रत्नागिरी यांचे नावे वर्ग करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांक : आरएलवाय-०९०३/१०६०/प्र.क्र.१४१/परि-५
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२ दिनांक : ६ मे, २००४

वाचा :- १) शासन अ.शा. पत्र, गृहविभाग, क्रमांक : आरएलवाय ०३०२/४०२/सीआर-३३/परि-५, दिनांक २२.८.२००२

२) जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांचे पत्र क्र.महसूल/कार्या-२/भूसं/सीआर-०३/, दि.१२.३.२००३

३) आयुक्त, कोकण विभाग कार्यालय, कोकण भवन, नवी मुंबई यांचे पत्र क्र.भूसं/का.१/क्र-२/५२६/२००३, दि. २१.७.२००३

शासन निर्णय :- शासन पत्र, गृहविभाग, क्रमांक : आरएलवाय ०३०२/४०२/सीआर-३३/परि-५,दिनांक २२.८.२००२ अन्वये कोकण रेल्वे प्रकल्पासाठी भूसंपादन कामासाठी रत्नागिरी जिल्हयात कार्यरत असलेल्या विशेष भूसंपादन अधिकारी, कोकण रेल्वे प्रकल्प, रत्नागिरी यांचे ९ पदाचे पथक कोकण रेल्वे महामंडळाला आवश्यकता नसल्याने दि.३१.८.२००२ पासून संपुष्टात आले आहे.

२. जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांनी त्यांचे आदेश क्र. मशा/कार्या-२/भूसं/सीआर-१५७/२००२, दि.२९.८.२००२ अन्वये विशेष भूसंपादन अधिकारी, कोकण रेल्वे, प्रकल्प रत्नागिरी यांचेकडे असलेली कोकण रेल्वे कॉर्पोरेशन लिमिटेडची व इतर भूसंपादनाची प्रकरणे न्यायालयीन प्रकरणे, लेखा विषयक कागपत्रे पुढील कार्यवाहीसाठी विशेष भूसंपादन अधिकारी, कोकण रेल्वे-१, रत्नागिरी यांचेकडे वर्ग केली आहेत. त्यामुळे जिल्हाधिकारी रत्नागिरी यांनी दि.१२.३.२००३ च्या पत्रान्वये शासनास विनंती केल्यानुसार विशेष भूसंपादन अधिकारी, कोकण रेल्वे प्रकल्प, रत्नागिरी यांचे स्वीय प्रपंजी लेखे खाती शिल्लक असलेली रक्कम रु.५०६५६५६ खातेदारांना अदा करणेसाठी महाराष्ट्र कोषागार नियम १९६८, खंड १ मधील नियम ५१२ मधील तरतूदीनुसार सदर रक्कम विशेष भूसंपादन अधिकारी, कोकण रेल्वे १, रत्नागिरी यांचे नावे वर्ग करण्यास तसेच लेखा परिक्षेच्या अधिन राहून स्वीय प्रपंजी लेखे (पी.एल.ए.) उघडण्यास शासन मंजूरी देत आहे. सदर लेखा ज्या प्रयोजनासाठी वापरण्यास मान्यता देण्यात आली त्याच प्रयोजनासाठी वापरण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, वित्त विभागाचे सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२३५/कोषा.प्र.५/दि, ८.१०.२००३ अन्वये तसेच महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई यांच्या सहमतीने व अनौपचारिक संदर्भ क्र.खवि/चार्ज-२/अनौपचारिक संदर्भ /१९८६, दि. ३१.३.२००४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(आ. बा. कमाळे)
कार्यासन अधिकारी, गृहविभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

आयुक्त, कोकण विभाग कार्यालय, कोकण भवन, नवीन मुंबई,
जिल्हाधिकारी, रत्नागिरी,
विशेष भूसंपादन अधिकारी / कोकण रेल्वे-१, रत्नागिरी
महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) / (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई